“श्री.नंदकुमार वर्मा, भा.प्र.से. (१९८९) (सेवानिवृत्त) यांची मिशन महासंचालक मनरेगा या पदावर कंत्राटी तत्वावर नेमणूक करण्याबाबत”.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन (रोहयो) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मग्रारो-२०२३/प्र.क्र.१९ /रोहयो-७**
१६ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २८ जुन, २०२३.

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र. क्र. १३७ /कार्यासन १२ दिनांक १७ डिसेंबर, २०१६.
२) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र. मग्रारो-२०२२/प्र.क्र.१७४/रोहयो-६अ दिनांक १४ डिसेंबर, २०२२.
३) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र. मग्रारो-२०२३/प्र.क्र.१९/रोहयो-७ दिनांक १८ एप्रिल, २०२३

**प्रस्तावना-**

दिनांक १४ डिसेंबर, २०२२ च्या शासन निर्णयाअन्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व अन्य विभागाच्या विविध योजनांच्या अभिसरणातून सुविधा संपन्न कुटुंब मिशन व सर्वांगीण ग्राम समृद्धी योजना राबवण्याचे निश्चित केले आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी मिशन महासंचालक, मनरेगा या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील सेवानिवृत्त अधिकाऱ्याची सेवा उपलब्ध करून घेण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. श्री नंदकुमार वर्मा, सेवानिवृत्त भारतीय प्रशासन सेवा यांचा अप्पर मुख्य सचिव, रोहयो पदावरील अनुभव व कार्यक्षमता याचा विभागास फायदा होईल ही बाब विचारात घेऊन त्यांना मिशन महासंचालक, मनरेगा या पदावर कंत्राटी तत्वावर नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

श्री. नंदकुमार वर्मा सेवानिवृत्त भारतीय प्रशासन सेवा यांची मिशन महासंचालक, मनरेगा या पदावर शासन आदेशानुसार नियुक्ती करण्यात येत आहे. या आदेशाच्या दिनांकापासून पुढील ०१ वर्षाच्या कालावधी करिता मिशन महासंचालक, मनरेगा या पदावर कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्यात येत आहे.

**सदर कंत्राटी तत्त्वावर नियुक्तीच्या संदर्भातील अटी व शर्ती पुढील प्रमाणे राहतील-**

१. श्री. नंदकुमार वर्मा यांना सेवानिवृत्तीपूर्वी मिळत असलेल्या एकूण वेतनातून (मूळ वेतन व महागाई भत्ता धरून त्यांना आता मिळत असलेले निवृत्ती वेतन (महागाई भत्ता आणि अंशराशीकृत निवृत्तीवेतनासह) वजा केल्यानंतर होणारी रक्कम मासिक पारिश्रमिक म्हणून निश्चित करण्यात यावी.

२. श्री. नंदकुमार वर्मा हे कंत्राटी तत्वावर म्हणून कार्यरत असेपर्यंत त्यांना सचिव या पदासाठी अनुज्ञेय असलेल्या सर्व सेवा सवलती व भत्ते अनुज्ञेय असतील.

३. वेळोवेळी शासन निश्चित करेल अशा अटी व शर्ती श्री.नंदकुमार वर्मा यांच्यावर बंधनकारक राहतील.

४. सदर नियुक्तीच्या कालावधीत श्री नंदकुमार वर्मा हे मिशन महासंचालक, मनरेगा या पदाचे कर्तव्य पालन करीत असताना या कालावधीत त्यांना राज्य शासकीय सेवेतील अधिकाऱ्यांना लागू असलेले वर्तणुक तसेच शिस्त व अपील यासंबंधीचे सर्व नियम लागू राहतील.

५. मिशन महासंचालक, मनरेगा यांची करार पद्धतीने करण्यात येणारी नियुक्ती ही नियमित स्वरूपाच्या कामकाजासाठी नसून विवक्षित कामासाठीच करण्यात येत आहे.

६.सदर कामासाठी करार पद्धतीने नियुक्ती करण्यात आलेल्या मिशन महासंचालक, मनरेगा या पदास कोणत्याही प्रकारचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार राहणार नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८१७२२३०९७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by JANA JIVA VALVI
Date: 2023.06.28 19:48:30 +05'30'

**( ज. जि. वळवी )**
**उप सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**श्री. नंदकुमार वर्मा, भा.प्र.से. (सेवानिवृत्त)**

**प्रत:**

१. मा मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३. मा मंत्री (रोहयो), यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक .
५. मा. प्रधान सचिव (रोहयो), यांचे स्वीय सहायक .
६. सर्व विभागीय आयुक्त
७. आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे.
८. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये.
१२. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे.
१३. संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.
१४. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व.
१५. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१६. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.
१७. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
१८. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)
१९. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा
२०. उपवनसंरक्षक (सर्व)
२१. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
२२. वित्त विभाग (अर्थ-१६ , व्यय-८)
२३. नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४)
२४. निवड नस्ती, रोहयो - ७.